**कृषि पंपाच्या विद्युतीकरणाचा प्रादेशिक असमतोल दूर करण्याकरीता महारष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य. सन २०१४-२०१५ (योजनांतर्गत)**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: कृषीअ-२०१४/प्र.क्र.६३/ऊर्जा-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दि.१४ जानेवारी, २०१५

**संदर्भ** - १) म.रा.विदयुत वितरण कं मर्यादित मुंबई यांचे क्र. महाव्यवस्थापक (भा.ख.वि)/९८ दिनांक १० जुलै २०१४ चे पत्र
२) शासन निर्णय क्रमांक कृषीअ -२०१४/प्र.क्र.६३/ऊर्जा -३ मंत्रालय, मुंबई -३२. दिनांक ०६ सप्टेबर २०१४

**प्रस्तावना :-**

कृषी पंपाच्या विद्युतीकरणाचा प्रादेशिक असमतोल दूर करण्याकरीता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित याना सहायक अनुदान देण्यासाठी सन २०१४ -२०१५ या आर्थिक वर्षात रू. १५०,००,००,०००/- (रूपये एकशे पन्नस कोटी फक्त ) इतकी अर्थसंकल्पिय तरतुद करण्यात आलेली आहे. त्यामधून आतापर्यंत रू. २७,७०,००,०००/- (रूपये सत्तवीस कोटी सत्तर लाख फक्त ) इतकी रक्क्म महाराष्ट्र राज्य विदयुत वितरण कंपनी मर्यादित यांना वितरीत करण्यात आली असून रू.१२२,३०,००,०००/- (रूपये एकशे बावीस कोटी तीस लाख फक्त) शिल्ल्क आहेत. त्यापैकी रू. ४७,४८,००,०००/- (रू. सत्तेचाळीस कोटी अठ्ठेचाळीस लाख फक्त) इतकी रक्क्म महाराष्ट्र राज्य विदयुत वितरण कंपनी मर्यादित यांना वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

कृषी पंपाच्या विदयुतीकरणाचा प्रादेशिक असमतोल दूर करण्याकरीता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना रू. ४७,४८,००,०००/- (रू. सत्तेचाळीस कोटी अठ्ठेचाळीस लाख फक्त) इतकी रक्क्म रोखीने वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

या निर्णयान्वये मंजुर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्क्म ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे, त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

वरील बाबींचा खर्च "मागणी क्र. के-६, मुख्यलेखाशीर्ष २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, ८०० - इतर खर्च, (००), राज्य योजनांतर्गत योजना, (००) (०६), कृषीपंप संचाच्या विद्युतीकरणाचा प्रादेशिक असमतोल दूर करण्यासाठी / ग्रामीण विद्युतीकरणासाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांस सहायक अनुदान (२८०१ २६८९) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर)" या खाली खर्ची टाकावा व तो सन २०१४ -२०१५ या वर्षासाठी मंजुर असलेल्या तरतुदीमधून भागवावा.

सदर रक्क्म अधिदान व लेखा अधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. वि.म.राजुरकर, अवर सचिव आणि नियंत्रण अधिकारी म्हणून

श्री. ब.शे.मांडवे, उपसचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२ यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना मंजूर झालेली रक्क्म रू. ४७,४८,००,०००/- (रू. सत्तेचाळीस कोटी अठ्ठेचाळीस लाख फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ३४६/ १४६१ दि. २७/११/२०१४ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ३२५/१४/व्यय-१६, दि. २५/१२/२०१४ मधील मंजुरीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०११९१६०४१८५६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन पाठविण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vilas Mahadeorao Rajurkar

Digitally signed by Vilas Mahadeorao Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labor, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas Mahadeorao Rajurkar
Date: 2015.01.19 16:18:31 +05'30'

**(वि.म.राजुरकर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत :-**

१) व्यवस्थापकीय संचालक, महावितरण कंपनी मर्यादित प्रकाशगड,बांद्रे (पूर्व),मुंबई -५१
२) सचिव महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं. १. १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा, मुंबई -५.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई -४०००२०
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र -२, नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
६) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
७) वि.का. अधिकारी (ऊर्जा -५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
८) कक्ष अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
९) वित्त विभाग/(अर्थसंकल्प -१३/साधनसंपत्ती/साऊ/व्यय -१६) मंत्रालय, मुंबई -३२.
१०) मुख्य अभियंता (विद्युत) सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई -१.
११) व्यवस्थापकीय संचालक, महासूत्रधार कंपनी मर्यादित, हॉगकॉंग बॅंक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई.
१२) निवडनस्ती (ऊर्जा -३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.